20100727185023001

**विकास योजना -अहमदपूर जि.लातूर**

स.नं.१९८/१ मधील आ.क्र.३४ बगीचा क्षेत्र ०.६४ हेक्टर पैकी ४३ आर क्षेत्र लिंगायत समाजाच्या स्माशानभूमीकरीता व उर्वरीत क्षेत्र बगीचा म्हणून आरक्षित करणेकरीता महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचनाअधिनियम, १९६६ चे कलम - ३७(२) अन्वये मंजूरीबाबत.

**अधिसूचना**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

क्र.टिपीएस-३७०९/१२६२/प्र.क्र.४३/२०१०/नवि-३०

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : २३ जुलै, २०१०.

**पहा :-** अ) मुख्याधिकारी, अहमदपूर नगर परीषद यांचे पत्र क्र.२००९/नपअ/कावि-५, दि.०१/०६/२००९

ब) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र./वि.यो.अहमदपूर(जि.लातूर)/२२२-२००९/टिपीव्ही-५/५७७१, दि.०५/०९/२००९

**शासन निर्णय :-** सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(शिवाजी पाटणकर)

महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रत :-

विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.

संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.

जिल्हाधिकारी, लातूर.

उप सचिव (नगर रचना) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

उप संचालक, नगररचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद

(त्यांना विनंती करण्यात येते की, मंजूर फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाच्या प्रती अधिप्रमाणीत करण्याकरिता शासनास सादर करावे.)

नगररचनाकार,लातूर शाखा, लातूर.

मुख्याधिकारी, अहमदपूर नगर परीषद, अहमदपूर जि. लातूर.

व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय,व ग्रंथागार, औरंगाबाद.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्राच्या , औरंगाबाद विभागीय पुरवणीमध्ये प्रसिध्द करुन त्याच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास व संचालक, नगरचना, पुणे यांना पाठवाव्यात.)

कक्ष अधिकारी, नवि-२९ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

(यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.)

निवड नस्ती, कार्यासन नवि-३०.

**विकास योजना -अहमदपूर जि.लातूर.**

स.नं.१९८/१ मधील आ.क्र.३४ बगीचा क्षेत्र ०.६४ हेक्टर पैकी ४३ आर क्षेत्र लिंगायत समाजाच्या स्माशानभूमीकरीता व उर्वरीत क्षेत्र बगीचा म्हणून आरक्षित करणेकरीता महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचनाअधिनियम, १९६६ चे कलम - ३७(२) अन्वये मंजूरीबाबत.

**अधिसूचना**

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २३ जुलै, २०१०.

**महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६**

**क्र.टिपीएस-३७०९/१२६२/प्र.क्र.४३/२०१०/नवि-३०:-**

ज्याअर्थी अहमदपूर शहराची विकास योजना (यापुढे ज्यास "उक्त विकास योजना" असे उल्लेखिलेली) शासन अधिसूचना क्र.टिपीव्ही-३४७७/ १४१/ नवि-५, दि.२८/०१/१९७७ अन्वये मंजूर झाली असून ती दि.०१/०४/१९७७ पासून अंमलात आलेली आहे तसेच वाढीव विकास योजना शासनाचे क्र.टिपीएस-३४००/६५१ सी/आर-१२४/युडी-६, दि.१८/०६/१९८१ अन्वये मंजूर झालेली असून ती दि. १५ ऑगस्ट १९८१ पासून अंमलात आलेली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत स.नं.१९८/१ मध्ये आ.क्र.३४ क्षेत्र ०.६४ हे. बगीचा करीता आरक्षीत आहे [यापुढे "उक्त जमिन" असे उल्लेखिलेले] ;

आणि ज्याअर्थी, अहमदपूर नगर परिषदेने तिच्या सर्वसाधारण सभेच्या ठराव दि.२९/१२/२००८ अन्वये उक्त जमीन पैकी ४३ आर क्षेत्र लिंगायत समाजाच्या स्मशानभूमीकरीता व उर्वरीत क्षेत्र बगीचा करीता आरक्षित करण्याचे ठरवून तिचे पत्र क्रमांक २००९/नपअ/कावि-५, दि.०१/०६/२००९ अन्वये महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे (यापुढे "उक्त अधिनियम" असे उल्लेखिलेला) कलम ३७ च्या उपकलम (१) अन्वये फेरबदलाचा प्रस्ताव (यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे उल्लेखिलेला) आवश्यक ती वैधानिक कार्यवाही पूर्ण करुन शासनास मंजूरीसाठी सादर केला आहे;

आणि ज्याअर्थी, संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेऊन व आवश्यक चौकशी नंतर उक्त फेरबदल प्रस्ताव मंजूर करणे आवश्यक आहे असे राज्य शासनाचे मत झाले आहे ;

त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम ३७ [२] अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकारांचा वापर करुन उक्त फेरबदल प्रस्तावास शासन मंजुरी देत आहे आणि त्यासाठी उपरोल्लिखित दि.२८/०१/१९७७ ची विकास योजना मंजूरीची अधिसूचना सुधारीत करण्यात येत आहे ;

उक्त विकास योजना मंजुरीच्या अधिसुचनेच्या शेवटच्या नोंदीनंतर पुढील नोंदीचा समावेश करण्यात येत आहे.

## नोंदः-

"विकास योजना- अहमदपूर मधील स.न.२९८/१ मधील आ.क्र.३४ बगीचा क्षेत्र ०.६४ हे पैकी४३ आर क्षेत्र सोबतच्या नकाशा दर्शविल्यानूसार नवीन आ.क्र.३४A 'लिंगायत समाजासाठी स्मशानभूमी' या करीता आरक्षित करण्यात येत आहे व उर्वरीत क्षेत्र बगीचा करीता आरक्षित करण्यात येते.

टिप :- १)वरील बदल दर्शविणारा, विकास योजनेचा भाग नकाशा मुख्याधिकारी, अहमदपूर नगर परीषद, जि. लातूर यांच्या कार्यालयात कार्यालयीन वेळेत नागरिकांच्या अवलोकनार्थ खुला ठेवण्यात आला आहे.

२)सदर अधिसूचना विभागाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेब साईटवर देखील उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

{ शिवाजी पाटणकर }
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

**Development Plan-Ahmedpur Dist. Latur**

Sanction under section 37(2) of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966

**NOTIFICATION**

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated :- 23 July, 2010.**

**The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966**

No. TPS-3709/1262/CR-43/2010/UD-30:-

Whereas the Development Plan of Ahmedpur has been sanctioned by the Government vide Urban Development Department's [hereinafter referred to as "the said Development Plan"] notification No.TPV-3471/141/UD-6, date-28/01/1977, which came into force from 01/04/1977 and extendedarea Development plan Notification No.TPS-3480- 65/ CR-124/UD-6 dated 18/06/1981 which has come into force from 15/08/1981 ;

And whereas in the said Development Plan the land bearing S.No. 198/1 area 0.64 Ha is reserved for Site No.34 Garden [hereinafter referred to as 'the said land'];

And whereas the Ahmedpur Municipal Council [hereinafter referred to as "the said Municipal Council"] has decided to delete the land out of 43 Are out of Site No 34 'Garden on S. no.198/1 & to reserve for Lingayat Burial Ground & remaining land to be reserved for Garden' [hereinafter referred to as "the said Modification Purposal"] and accordingly the said Municipal Council has submitted the modification proposal to Government for sanction vide its Marathi letter no.२००९/नपअ/कावि-५ dt. 01/06/2009, after following all legal procedure stipulated under section 37 (1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 [Maharashtra XXXVII of 1966][hereinafter referred to as "the said Act"] ;

And whereas after making necessary enquiries and after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune the Government of Maharashtra is of the opinion that the said modification proposal should be sanctioned;

Now, therefore, in exercise of powers conferred under sub-section [2] of section 37 of the said Act, Government hereby sanctions the said modification proposal for that purpose amends the above referred Notification , dated 28/1/1977 as follows ;

In the Schedule of Modification appended to the Notification sanctioning the said Development Plan, following new entry shall be added;

**ENTRY**

"In the Development Plan of Latur area @ 43 Are out of Site No.34 Garden on land bearing S.No.198/1 is deleted from the reservation & reserved for new Site No 34A 'Lingayat Burial Ground' & remaining land reserved for Garden as shown on the plan."

**Note:-** 1] The aforesaid part plan showing the sanctioned modification is kept open for inspection for the public during office hours at the office of the Chief Officer, Ahmedpur Municipal council Dist.Latur.

2] This Notification is also available on departments web site www.urban.maharashtrta.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

[ Shivaji Patankar ]
**Under Secretary to Government**